**एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत गुळ -शेंगदाणा लाडू ऐवजी गुळ-शेंगदाणा चिक्की स्वरूपात पुरवठा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महिला व बाल विकास विभाग

शासन निर्णय ,क्रमांक :एबावि २०११ / प्र.क्र.१३८ /का-५

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २ जून , २०११

**<u>वाचा</u> :-**१) शासन निर्णय , महिला व बाल विकास क्र. एबावि-२०११/प्र.क्र.५१/का-५, दिनांक ९ मार्च, २०११

२) शासन निर्णय , महिला व बाल विकास क्र. एबावि-२०११/प्र.क्र.७४/का-५, दिनांक २३ मार्च, २०११

३) शासन निर्णय , महिला व बाल विकास क्र. एबावि-२०११/प्र.क्र.५२/का-५, दिनांक ३१ मार्च, २०११

४) आयुक्त, महिला व बाल विकास ,महाराष्ट्र राज्य , पुणे यांचे पत्र क्रमांक मबावि /एबाविसेयो / का-२ /१५१३ /२०११, दिनांक ११.५.२०११ .

**<u>शासन निर्णय</u> :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांनी मागविलेल्या निविदेतील मान्य दरानुसार मे. सृष्टी महिला उद्योग , वसई, जिल्हा ठाणे या संस्थेकडून प्रति लाडू (१० ग्रॅम) रू १.२७ या दराने ग्रामीण , नागरी आणि आदिवासी प्रकल्पातील अंगणवाडयातील बालके, गरोदर स्त्रिया आणि स्तनदा माता यांचेसाठी गुळ-शेंगदाणा लाडू खरेदी करण्यास आणि त्यासाठी येणा-या खर्चास अनुक्रमांक (१), (२) व (३) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

२. तथापि, आता गुळ-शेंगदाणा लाडू मधील मूळ घटक, वजन (१० ग्रॅम) आणि पौष्टिकता कायम ठेवून अनुक्रमांक (१) , (२) व (३) च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधिन राहून आणि निविदेतील अटी व शर्तीचा भंग होणार नाही व लेखा आक्षेप उद्‌भवणार नाही हया अटीच्या अधिन राहून गुळ-शेंगदाणा लाडू ऐवजी गुळ-शेंगदाणा चिक्की स्वरूपात हवा बंद पॅकींग मध्ये खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. या बाबत आवश्यक ते यथोचित हमीपत्र पुरवठाधाराकांकडून आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांनी घेण्यात यावे.

४. यासाठी होणारा खर्च संदर्भाधीन अनुक्रमांक (१) (२) व (३) च्या शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या लेखाशिर्षाखालील तरतुदीतून भागविण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(शं.शा.पढाळ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, महिला व बाल विकास पुणे
संचालक, आरोग्य सेवा ,मुंबई
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, (आयुक्त, एबाविसेयो यांचे मार्फत)
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण / ग्राम पंचायत), (आयुक्त, एबाविसेयो यांचे मार्फत)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
सहाय्यक संचालक (लेखा ) महिला व बाल विकास पुणे
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
महिला व बाल विकास विभाग, कार्या-४.
निवड नस्ती (कार्यासन-५)

३.	या बाबत आवश्यक ते यथोचित हमीपत्र पुरवठाधाराकांकडून आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांनी घेण्यात यावे.

४.	यासाठी होणारा खर्च संदर्भाधीन अनुक्रमांक (१) (२) व (३) च्या शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या लेखाशिर्षाखालील तरतुदीतून भागविण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(शं.शा.पंढाळ)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, महिला व बाल विकास पुणे
संचालक, आरोग्य सेवा ,मुंबई
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, (आयुक्त, एबाविसेयो यांचे मार्फत)
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण / ग्राम पंचायत), (आयुक्त, एबाविसेयो यांचे मार्फत)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
सहाय्यक संचालक (लेखा ) महिला व बाल विकास पुणे
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
महिला व बाल विकास विभाग, कार्या-४.
निवड नस्ती (कार्यासन-५)